डिजीटल इंडिया भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम -आधुनिक अभिलेख कक्षांकरीता कॉम्पॅक्टर्स व अनुषंगिक साहित्य खरेदी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक राभूअ-२०१७/प्र. क्र. २८१ /ल-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ३० मार्च, २०१७

वाचा :-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक: राभूअ-२०१४/प्र.क्र.१८२/ल-१, दि.०६.०६.२०१४
२) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील १०९ व्या उच्चाधिकार समितीच्या दि. २७/०१/२०१७ च्या बैठकीचे इतिवृत्त.
३) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडील पत्र क्रमांक: महाआयटी/पीएसआर/००१/२०१७, दि. २३/०२/२०१७.
४) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडील पत्र क्रमांक:एनएलआरएमपी-१/NITC निधी वर्ग/२०१७, दिनांक /०२/२०१७.
५) शासन निर्णय, माहिती तंत्रज्ञान विभाग क्रमांक: मातंसं-१७१६/प्र. क्र. २८६/३९, दि. ९/०८/२०१६.

प्रस्तावना :-

१.१ डिजीटल इंडिया भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यात सुरु असून या अंतर्गत आधुनिक अभिलेख कक्षांची स्थापना करणे हा एक घटक अंतर्भूत आहे. त्याअनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि. ६/०६/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील सर्व तहसिल कार्यालयांतील/ तालुकास्तरीय भूमि अभिलेख कार्यालयातील महत्वाच्या जुन्या अभिलेखाच्या स्कॅनिंगचे काम सुरु असून ते अंतिम टप्प्यात आहे. सदरचे स्कॅनिंगचे काम पूर्ण झाले नंतर अभिलेखांच्या नकला नागरिकांना वितरीत करणेसाठी सर्व तहसिल कार्यालयांकरीता/ तालुकास्तरीय भूमि अभिलेख कार्यालयांकरीता आवश्यक ते संगणक हार्डवेअर (उदा. हाय एंड पी.सी., डेस्कटॉप पी.सी., प्रिंटर व स्कॅनर इ.) उपलब्ध करुन देणे क्रमप्राप्त आहे. तसेच भविष्यकालीन उपयोगासाठी आधुनिक अभिलेख कक्षातील अभिलेख सुरक्षित, सुस्थितीत व कमी जागेत जतन करुन ठेवणेसाठी कॉम्पॅक्टर स्थापित करणे आवश्यक आहे. त्यानुसार राज्यातील एकूण ७४० तहसिल कार्यालय/ तालुकास्तरीय भूमि अभिलेख कार्यालयांत हार्डवेअरचा पुरवठा करणे व प्रथम टप्प्यात १७५ भूमि अभिलेख कार्यालयांकरीता कॉम्पॅक्टर खरेदी करणे हा विषय मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि.२७/०१/२०१७ रोजीच्या बैठकीत विचारार्थ सादर करण्यात आला असता उच्चाधिकार समितीने ७४० तहसिल कार्यालय/तालुकास्तरीय भूमि अभिलेख कार्यालयांकरीता आवश्यक असणा-या संगणक हार्डवेअरची तसेच १७५ भूमि अभिलेख कार्यालयात स्थापित करावयाच्या कॉम्पॅक्टर्सची खरेदी, "महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्यादित" या संस्थेमार्फत करण्यास मान्यता दिलेली आहे.

१.२ माहिती तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेले महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ हे, माहिती तंत्रज्ञान विषयक संयंत्रे, साधनसामुग्री व सेवांचा पुरवठा करणारी राज्याची एकमेव यंत्रणा असेल असे घोषित करण्यात आले आहे. तसेच, सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ६.१ अन्वये शासकीय विभागांना सदर महामंडळाच्या मागणीप्रमाणे प्रत्येक प्रकल्पासाठी अग्रीम निधी महामंडळास प्रदान करण्यासही मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, संदर्भाधीन क्र. ३ येथील पत्रान्वये उक्त कॉम्पॅक्टर्स व संगणक विषयक विचाराधीन पुरवठ्यासंदर्भात महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाने "**परिशिष्ट-अ"** प्रमाणे रु. ३४,८०,५०,०००/- इतका निधी सदर महामंडळाकडे आगाऊ स्वरुपात जमा करण्याबाबत कळविले असून त्यानुसार रु. ३४,८०,५०,०००/- इतका निधी सदर महामंडळाकडे वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय-**

राज्यातील ३५८ तहसिल कार्यालये, ३५२ उप अधीक्षक भूमि अभिलेख कार्यालये व ३० नगर भूमापन कार्यालये अशा एकूण ७४० कार्यालयांतील अभिलेख कक्षांकरीता आवश्यक संगणक हार्डवेअर खरेदी करणे तसेच भूमि अभिलेख विभागाच्या कार्यालयांपैकी १७५ कार्यालयांकरीता कॉम्पॅक्टर्स खरेदी करणे या साठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्यादित यांजकडे रु. ३४,८०,५०,०००/- (रुपये चौतीस कोटी ऐंशी लक्ष व पन्नास हजार फक्त) इतका निधी आगावू वर्ग करण्याच्या दृष्टीने उक्त निधी जमाबंदी आयुक्त व संचालक भुमि अभिलेख महाराष्ट्र राज्य यांना वितरीत करण्यात येत आहे.

०२. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भुमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य हे आहरण व संवितरण अधिकारी रहातील. सदर निधीच्या विनियोगासाठी त्यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत व खर्चाचा ताळमेळ महालेखापालांकडे वेळोवेळी देण्याची दक्षता घ्यावी. तसेच प्रस्तुत निधीबाबत आर्थिक व भौतिक अहवाल, उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनास पाठवावा.

०३. सदर खर्चापैकी, रुपये ३१,८५,९७,०००/- (रुपये एकतीस कोटी पंचाऐशी लक्ष व सत्त्यान्नव हजार इतका खर्च, सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात "मागणी क्र. सी १, २०२९ जमीन महसूल (००) (०६) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य) पुणे, राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम ५०% केंद्र पुरस्कृत योजना " याअंतर्गतच्या लेखाशिर्ष २०२९०८१४ (५०% राज्य हिस्सा) मध्ये उपलब्ध रु. ९,६०,००,०००/- व लेखाशिर्ष २०२९०८३२ (५०% केंद्र हिस्सा) मध्ये उपलब्ध रु २२,२५,९७,०००/- इतक्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच, उर्वरीत खर्च रु. २,९४,५३,०००/- (रुपये दोन कोटी चौ-यान्नव लक्ष त्रेपन्न हजार फक्त) हा "ई महाभूमी" प्रकल्प व्यवस्थापन संस्थेच्या खाती लेखाशिर्ष २०२९०८१४ व लेखाशिर्ष २०२९०८३२ अंतर्गत जमा असणा-या निधीमधून भागविण्यात यावा.

०४. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८९/२०१७ / व्यय-१० व अनौसं. ८७/१७/कोषा प्र-५, दि. २३ / ०३/२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०२०२२१९६७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्याआदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.03.30 20:26:42 +05'30'

**(डॉ. संतोष भोगले)**
**शासनाचे उप सचिव,**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त
९. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे
१०.सर्व जिल्हाधिकारी
११.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१३.कोषागार अधिकारी, पुणे
१४.माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.नियोजन विभाग, का.क्र. १४७५, मंत्रालय, मुंबई
१६.वित्त विभाग,कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प-६/कोषा प्रशा-५, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती ल-१

# परिशिष्ट-अ

(शासन निर्णय क्रमांक राभूअ-२०१७/प्र. क्र. २८१ /ल-१, दिनांक: ३० मार्च, २०१७)

| Sr. No. | Item Description | Unit Rate In INR | Quantity in No. | Total estimation in INR |
|---|---|---|---|---|
| १ | Compactor- ४० cu. meter | - | ११० | १५,४०,००,००० |
| २ | Compactor- ३० cu. meter | - | ६५ | ६,८२,५०,००० |
| ३ | High End Client | ८५,००० | ७४० | ६,२९,००,००० |
| ४ | Desktop Entry Level | ४५,००० | ७४० | ३,३३,००,००० |
| ५ | Printer A३ | ३०,००० | ७४० | २,२२,००,००० |
| ६ | Scanner-Flatbed | १०,००० | ७४० | ७४,००,००० |
| Total (Thirty four Crore eighty lakh fifty thousand only) | | | | ३४,८०,५०,००० |